**सन २०२४-२५ करिता मुख्यलेखाशीर्ष २०५२- सचिवालय सर्वसाधारण सेवा ०९०- सचिवालय (००) (१६) ई-गव्हर्नन्स प्रकल्प राबविण्यासाठी तरतूद (२०५२५०७२) (कार्यक्रम) खालील १७-संगणक खर्च या तपशीलवार शीर्षाखालील मंजूर अनुदानातून निधी वितरण करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग (मातं)

## शासन निर्णय क्र. अर्थसं २७२५/प्र.क्र.२७/मातं

मादाम कामा मार्ग,मंत्रालय,मुंबई ४०० ०३२

दि. १७ फेब्रुवारी, २०२५

**प्रस्तावना :-**

ई-गव्हर्नन्स अंतर्गत राज्य शासनासाठी राबविण्यात येणारे विविध प्रकल्प उदा. सी.एम. डॅश बोर्ड, सी.एम हेल्पलाईनशी संबधित प्रदाने, सिक्युरीटी ऑपरेशन सेंटर अशा बाबींसाठी होणारा खर्च माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडून (२०५२५०७२) या लेखाशीर्षांतर्गत १७- संगणक खर्च या उद्दिष्टाखालील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात येतो. माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने प्रस्तावित केल्यानुसार सदर उद्दिष्टाखाली सन २०२४-२५ करीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून रु. ३१,६१,०००/-(अक्षरी रु.एकतीस लाख एकसष्ठ हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८२/अर्थ-३,दिनांक २५.०७.२०२४ च्या परिशिष्ट ३ मध्ये नमूद उद्दिष्टांसाठी सन २०२४-२५ च्या प्रथम नऊ माहीकरीता (डिसेंबर,२०२४ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६०% च्या मर्यादेत BEAMS प्रणालीवर वितरित करण्यात आला आहे.

माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकरिता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात ई-गव्हर्नन्सशी संबधित ड्रोन पॉलिसी तयार करण्यासाठी मानधनावरील खर्च भागविण्याकरिता (२०५२५०७२) या लेखाशीर्षांतर्गत १७- संगणक खर्च (कार्यक्रम) या उद्दिष्टाखाली मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून वितरीत तरतूदीच्या मर्यादेत माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने प्रस्तावित केल्यानुसार रु.३१,६१,०००/-(अक्षरी रु.एकतीस लाख एकसष्ठ हजार फक्त) इतका निधी वित्त विभागाच्या खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**१)** सदर निधी संचालनालयाने प्रस्तावित केल्यानुसार ड्रोन पॉलिसी तयार करण्यासाठी महाआयटीकडून नेमणूक करण्यात आलेल्या Consultant चे मानधन अदा करण्याकरीता खर्ची पाडून त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याची सर्वस्वी जबाबदारी माहिती तंत्रज्ञान संचालनालयाची राहील.

माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने ई-गव्हर्नन्सशी संबधित ड्रोन पॉलिसी तयार करण्यासाठी मानधनावरील खर्च मागणी क्रमांक-ए-४, सचिवालय सर्वसाधारण सेवा ०९० सचिवालय (००) (१६) ई-गव्हर्नन्स प्रकल्प राबविण्यासाठी तरतूद (२०५२५०७२)१७- संगणक खर्च (कार्यक्रम) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. व तो सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर खर्च करतांना वित्त विभागाच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे व खर्चित रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.६३/का.१४४३ दि.३०.०१.२०२५ व वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.१३१ व्यय-४ दि.०७.०२.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१७१५२२२२७५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by BHARATI DINESH DHURI
Date: 2025.02.17 15:25:13 +05'30'

**( भारती दि. धुरी )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई
३) महालेखापाल (लेखा परीक्षा) ,महाराष्ट्र-२ नागपूर
४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
५) वित्त विभाग (व्यय-४) ,मंत्रालय, मुंबई
६) अर्थसंकल्प शाखा (सामान्य प्रशासन विभाग), मंत्रालय, मुंबई
७) संचालक,माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई
८) निवडनस्ती